न्यायालयीन प्रकरणाशी संबंधित प्रशासकीय
विभागाने सदर प्रकरणी वित्त विभागाचे
अभिप्राय प्राप्त झाल्यानंतर, शासनाच्या वतीने
एकत्रित शपथपत्र दाखल करण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
शासन परिपत्रक क्रमांक - संकीर्ण-१०१०/प्र.क्र.१४५/सेवा-९
दिनांक - ८ ऑक्टोबर, २०१०.

पहा :-१)विधी व न्याय विभाग परिपत्रक क्रमांक :-१२८७/ई, दिनांक : २ मे १९९६
२)विधी व न्याय विभाग परिपत्रक क्रमांक :-१६८९/ई, दिनांक : २५ जून १९९६
३)विधी व न्याय विभाग शासन परिपत्रक क्रमांक :-५/व्हीआयपी/ई, दिनांक :३० मार्च २०१०

न्यायालयीन प्रकरणाशी संबंधित संवर्ग ज्या प्रशासकीय विभागाच्या नियंत्रणाखाली आहे, अशा प्रशासकीय विभागासच सदर संवर्गासंबंधीच्या सेवाविषयक सर्व बाबींची माहिती असते. तथापि, असे निदर्शनास आले आहे की, न्यायालयीन प्रकरणाशी संबंधित प्रशासकीय विभागाकडून सदर प्रकरणी वित्त विभागाचे अभिप्राय प्राप्त झाल्यानंतरही, शासनाच्या वतीने एकत्रित शपथपत्र दाखल केले जात नाही. केवळ प्रशासकीय विभागाच्या वतीने विभागामार्फत किंवा प्रशासकीय विभागाच्या नियंत्रणाखालील अन्य अधिकाऱ्यांकडून शपथपत्र दाखल केले जाते. शपथपत्र वित्त विभागाच्याही वतीने दाखल करण्यात येत असल्याबाबत उल्लेख शपथपत्रात नसल्यामुळे मा. उच्च न्यायालय किंवा महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाकडून वित्त विभागास स्वतंत्र शपथपत्र दाखल करण्याचे आदेश दिले जातात व त्यानुसार वित्त विभागास स्वतंत्र शपथपत्र दाखल करावे लागते. तथापि, वित्त विभागामार्फत स्वतंत्रपणे दाखल केलेले शपथपत्र मर्यादित मुद्यांसंबंधी (वित्त विभागाशी संबंधित) असते. प्रकरणाशी संबंधित संवर्ग ज्या प्रशासकीय विभागाच्या नियंत्रणाखाली आहे, अशा प्रशासकीय विभागासच सदर संवर्गासंबंधीच्या सेवाविषयक सर्व बाबींची माहिती (सेवाप्रवेश नियम, समकक्ष पदे, पदोन्नतीच्या संधी, वेतन सुधारणा, रजा, निवृत्तिवेतनविषयक बाबी इ.) असते. यामुळे प्रकरणाचा एकूण विचार करताना प्रशासकीय विभागाचे शपथपत्र महत्वाचे असते.

**वरील परिच्छेदामध्ये नमूद केलेल्या परिस्थितीत शासनाच्या विविध विभागांचा समन्वय नसल्याचा संदेश जातो. हे टाळण्याकरिता, न्यायालयीन प्रकरणाशी संबंधित प्रशासकीय विभागाने, न्यायालयीन प्रकरणी वित्त विभागाचे अभिप्राय प्राप्त झाल्यानंतर, न्यायाधिकरणाचे / न्यायालयाचे विशिष्ट निर्देश असणारी प्रकरणे वगळून शासनाच्या वतीने एकत्रित शपथपत्र (वित्त विभागासह) न चुकता दाखल करण्याची दक्षता घ्यावी. संबंधित सह सचिव / उप सचिव यांनी शासनाच्या वतीने एकत्रित शपथपत्र दाखल होईल याकरिता आवश्यक खबरदारी घ्यावी.**

सदर शासन परिपत्रक विधी व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६६९/ई, दिनांक १३ सप्टेंबर,२०१०अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

(कृमाप)

उपरोक्त शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २०१०१००८१६४८५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शि.म.म्हात्रे )
उप सचिव, वित्त विभाग

प्रति,

अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग,
सर्व सह सचिव / उप सचिव, मंत्रालयीन विभाग,
विधी व न्याय विभाग, इ शाखा, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
वित्त विभागातील सर्व कार्यासने
सरकारी वकील (मूळ शाखा /अपील शाखा) रिट सेल, मुंबई,
सरकारी वकील, उच्च न्यायालय/मुंबई/ खंडपीठ नागपूर/औरंगाबाद,
सर्व जिल्हा सरकारी वकील कार्यालय,
मुख्य सादरकर्ता अधिकारी,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई/नागपूर/औरंगाबाद,
निवडनस्ती, वित्त विभाग/सेवा-९